**शासन मान्य अशा ५ संगणक संस्थातून संगणक प्रशिक्षण घेतलेले अधिकारी/कर्मचारी चाचणी परीक्षा (Confirmatory Test) अनुत्तीर्ण झाल्यास त्यांचेकडून वसूल होणारी रक्कम जमा करण्यासाठी लेखाशिर्ष उघडणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
शासन निर्णय क्रमांक प्रशिक्षण १००२/प्रक्र२६०/२००२/३९
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक: ३० ऑक्टोबर, २००२

वाचावे:- १) शासन निर्णय, सामान्य प्रशासन विभाग, क्रमांक प्रशिक्षण १०००/प्रक्र१४३/३९, दि. १०.७.२००

२) शासन परिपत्रक सामान्य प्रशासन विभाग क्रमांक प्रशिक्षण १००२/प्रक्र२६०/३९, दि. ५.७.२००२

**प्रस्तावना**

शासकीय कामकाजात संगणकाचा वापर व्हावा म्हणून शासन मान्य अशा ५ संगणक संस्थातून शासकीय खर्चाने संगणक प्रशिक्षण देण्याची योजना राबविण्यांत आली. दोन वर्षानंतर या योजनेचा आढावा घेतल्यानंतर ही योजना रद्द करुन ज्या शासकीय अधिकारी/कर्मचाऱ्यांनी या योजनेंतर्गत संगणक प्रशिक्षण घेतलेले आहे त्यांची चाचणी परीक्षा (Confirmatory Test) घेण्याचा व या चाचणी परीक्षेत अनुत्तिर्ण होणाऱ्यांकडून संदर्भिय क्र. १ व २ येथील आदेशातील तरतुदींनुसार रक्कम वसुल करण्याचा निर्णय घेण्यांत आला. तथापि वसुल झालेली रक्कम कोणत्या लेखाशिर्षाखांली जमा करावी याबाबत विचारणा होत होती. त्यानुसार चाचणी परीक्षा अनुत्तिर्ण होणाऱ्यांकडून वसुल झालेली रक्कम कोणत्या लेखाशिर्षाखाली जमा करावी याबाबत खालील प्रमाणे निर्णय घेण्यांत येत आहे.

**शासन निर्णय:-**

शासकीय खर्चाने शासन मान्य अशा ५ संगणक संस्थातून संगणक प्रशिक्षण घेऊन संगणक प्रशिक्षण खर्चाची रक्कम घेतलेल्या अथवा अशा रक्कमेची मागणी केलेल्या अधिकारी/कर्मचाऱ्यांची चाचणी परीक्षा (Confirmatory Test) घेण्यात येते. या चाचणी परीक्षेत अनुत्तिर्ण होणाऱ्यांकडून जमा होणारी रक्कम; संबंधित विभागांनी/कार्यालयांनी संगण प्रशिक्षणासाठीच्या प्रतिपूर्तीसाठी (संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहानात्मक रक्कम) ज्या प्रधान लेखाशिर्षाखाली तरतुद केली असेल त्याच प्रधान लेखाशिर्षाखाली 'रजा-अतिप्रधानांची वसूली' असे नवीन उपलेखा शिर्ष उघडून या लेखाशिर्षाखाली चाचणी परीक्षेत अनुत्तिर्ण होणाऱ्यांकडून वसूल होणारी रक्कम जमा करावी. उदा. जर '२०५२' या प्रदान लेखाशिर्षाखाली संगणक प्रशिक्षण खर्च व प्रोत्साहानात्मक रक्कमेची तरतुद केलेली असेल तर खालील प्रमाणे लेखाशिर्ष उघडण्यात यावे.

'२०५२,सेक्रेटरीएट-सर्वसाधारण सेवा
९११,रजा-अतिप्रधानांची वसूली
(००) (०१) अतिप्रधानांची वसूली (            )
९० रजा वसूली.'

वर नमुन्यादाखल दिलेल्या लेखाशिर्षा प्रमाणे संबंधित विभाग/कार्यालयांनी ज्या-ज्या लेखाशिर्षाखाली संगणक प्रशिक्षण खर्चाच्या प्रतिपूर्तीसाठी तरतूद केलेली असेल त्या-त्या लेखाशिर्षाखाली 'रजा अतिप्रधानाची वसूली' असे उपलेखाशिर्ष उघडून त्यास महालेखापाल यांचे मान्यतेनंतर सहसंचालक लेखा व कोषागारे

(कृ.मा.प.

(तांत्रीक) यांचेकडून संगणक सांकेतांक उपलब्ध करुन घ्यावा व जमा होणारी रक्कम या लेखाशिर्षाखाली जमा करावी.

हा निर्णय वित्त विभागाचा अनौपचारिक संदर्भ क्र. १०२१/असं-१३, दि. ९.१०.२००२ अन्वये मिळालेल्या संमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने.

(नितीन गद्रे)
उप सचिव (मातं)

**प्रति,**

राज्यपालांचे सचिव
मुख्यमंत्री यांचे सचिव
उपमुख्यमंत्री यांचे सचिव
सर्व मंत्री/राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
सर्व राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव
शासनाचे मुख्य सचिव
* प्रबंधक, उच्चन्यायालय, मूळशाखा,मुंबई
* प्रबंधक, उच्चन्यायालय, अपीलशाखा,मुंबई
* प्रबंधक, लोकआयुक्त व उपलोकायुक्त यांचे कार्यालय,मुंबई
* सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग,मुंबई
सचिव, महाराष्ट्र विधान मंडळ सचिवालय, (विधान परिषद/विधान सभा)मुंबई
महालेखापाल-१(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१,मुंबई
महालेखापाल-२(लेखा व अनुज्ञेयता)महाराष्ट्र-१,नागपूर
शासनाचे सर्व अपर मुख्य सचिव/प्रधान सचिव/सचिव
पोलीस महासंचाक,मुंबई
सर्व पोलीस उपमहासंचालक,मुंबई
सर्व पोलीस आयुक्त
सर्व विभागीय आयुक्त
सर्व महानगरपालिकांचे आयुक्त
सर्व जिल्हापरिषदांचे मुख्य कार्यकारी अधिकारी
व्यवस्थापकीय संचालक, महाराष्ट्र ज्ञान महामंडळ मर्यादित,पहिला मजला, व्यवसाय शिक्षण व प्रशिक्षण इमारत,३,महानगरपालिका मार्ग,मुंबई ४०००१
सर्व जिल्हाधिकारी
सर्व नगरपालिकांचे मुख्याधिकारी
सर्व मंत्रालयीन विभाग
सचिव, महाराष्ट्र राज्य तंत्रशिक्षण मंडळ,मुंबई
अधिदान व लेखाधिकारी,मुंबई/लेखाकोष भवन,वांद्रे (पू)मुंबई
निवासी लेखापरिक्षा अधिकारी,मुंबई
मंत्रालयीन विभागांच्या नियंत्रणाखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख
सामान्य प्रशासन विभागातील सर्व कार्यालये
निवड नस्ती.

---

एच-897(अ)(4000-10-02)1अ.